**मा. मुख्य न्यायमूर्ती व मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या कार्यालयाकरिता Storage Area Network (SAN) Storage, Rack & Switches System कार्यान्वित करण्याच्या रु. ५६,६५,३४१/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. संप्रिसा- २०१७/प्र.क्र. ५५/का.७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १५ जुलै, २०२०.

वाचा :- १) समक्रमांकाचे दिनांक ३ नोव्हेंबर, २०१८ रोजीचे शासन ज्ञापन.
२) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र. Comp./Sec./२७/२०१९,दिनांक ८.४.२०१९.
३) दिनांक२७.०५.२०१९ रोजीच्या विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणीसमितीच्या बैठकीचे इतिवृत्त.
४) समक्रमांकाचे शासन शुध्दीपत्रक दिनांक १५.०६.२०१९.
५) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र.Comp./Sec./१८८/२०२०, दिनांक १५.०६.२०२०.

प्रस्तावना :-

मा. मुख्य न्यायमूर्ती व मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या कार्यालयाकरिता Storage Area Network (SAN) Storage, Rack & Switches System कार्यान्वित करण्यास दिनांक ३ नोव्हेंबर, २०१८ रोजीच्या शासन ज्ञापनान्वये तसेच दिनांक १५.०६.२०१९ रोजीच्या शासन शुध्दीपत्रकान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात अाली आहे. संदर्भ क्र. ३ अन्वये मा. मुख्य न्यायमूर्ती व मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या कार्यालयाकरिता Storage Area Network (SAN) Storage, Rack & Switches System कार्यान्वित करण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्याची विनंती केली होती. विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक २७.०५.२०१९ रोजीच्या बैठकीत सदर प्रस्तावास मान्यता देण्यात आली.

तथापि, कोरोना विषाणू प्रसारावरील प्रतिबंधात्मक उपायाच्या अनुषंगानेआवश्यक ती कार्यवाही दिनांक ३१.०३.२०२० पर्यंत खरेदी प्रक्रिया पूर्ण करता आली नाही. वित्तीय वर्ष २०१९-२० मध्ये मान्यता देण्यात आलेला निधी प्रत्यर्पित झाला. दरम्यान ई-टेंडरींग प्रक्रियेद्वारे

मा. मुख्य न्यायमूर्ती यांच्या कार्यालयाकरिता SAN Storage Rack & Switches System कार्यान्वित करण्याकरिता संदर्भ क्र. ५ अन्वये प्रस्ताव शासनास सादर केला होता.

या प्रस्तावास वित्त विभागाचे शासन निर्णय दिनांक०४.०५.२०२० अन्वये कोविड-१९ च्या संसर्गजन्य रोगामुळे सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात होणाऱ्या अर्थव्यवस्थेवरील परिणामाबाबत वित्तीय उपाययोजना करण्याच्या १२) अ) अन्वये खरेदीवर निर्बंध असल्याने, सदर निर्बंधातून सुट मिळण्याची विनंती करण्यात आली. त्यास वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३०७/ २०२०/व्यय-५, दिनांक ०८.०७.२०२० अन्वये खरेदीवरील निर्बंधातून सुट देण्यात मान्यता दिली आहे. या पार्श्वभूमीवर खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

मा. मुख्य न्यायमूर्ती व मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या कार्यालयाकरिता Storage Area Network (SAN) Storage, Rack & Switches System कार्यान्वित करण्यासाठीच्या रु. ५६,६५,३४१/- (अक्षरी रु. छपन्न लक्ष पासष्ट हजार तीनशे एकेचाळीस फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. Storage Area Network (SAN) Storage, Rack & Switches System कार्यान्वित करण्याकरिता आवश्यक असलेली हार्डवेअर सामुग्रीची खरेदी GeM पोर्टलवरुन करण्यात यावी. हार्डवेअर सामुग्री GeM पोर्टलवर उपलब्ध नसल्यास E-Tendaring प्रक्रियेद्वारे खरेदी करण्यात यावी.

३. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधी व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) या लेखाशिर्षाखाली "१७ संगणक खर्च" या उदिष्टांतर्गत भागविण्यात यावा.

४. मा. मुख्य न्यायमूर्ती व मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या कार्यालयाकरिता Storage Area Network (SAN) Storage, Rack & Switches System कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक रु. ५६,६५,३४१/- (अक्षरी रु. छपन्न लक्ष पासष्ट हजार तीनशे एकेचाळीस फक्त) इतका निधी महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई,जे ०००२ यांना वितरीत करण्यात येत आहे.

५. वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ मधील २ व ३ या अटींच्या अनुषंगाने प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३०७/२०२०/व्यय-५, दिनांक ०८.०७.२०२० अन्वये खरेदीच्या निर्बंधातून सुट मिळण्यास सहमतीत दर्शविल्यातून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमुन्यात त्वरीत शासनास सादर करावे.

८. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे. त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००७१५११४११९२८१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nitin Virsen Jiwane

Digitally signed by Nitin Virsen Jiwane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, serialNumber=38da45fc182de9210d4220cd41371018a4d6f00892e5d1478cba8413afb06c03, cn=Nitin Virsen Jiwane
Date: 2020.07.15 12:01:16 +05'30'

**( नितीन वि. जिवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१. महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई,
२. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता, लेखा परीक्षा ),-१/ २, मुंबई/नागपूर,
४. मा. सचिव, व्यय-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. संचालनालय, लेखा व कोषागारे , ठाकरसी हाऊस ३, मुंबई पोर्ट ट्रस्ट, २ रा मजला, शुरजी वल्लभदास मार्ग, बेलार्ड इस्टे, मुंबई.
८. संचालक, उद्योग सह संचालक (भांख) / उद्योग संचालनालय, मुंबई.
९. सह सचिव, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. निवड नस्ती/का.७.